एकात्मिक फलोत्पादन विकासासाठी केंद्र पुरस्कृत अभियान अंतर्गत अनुसूचित जमाती प्रवर्गासाठी निधी वितरीत करण्याबाबत.
(केंद्र हिस्सा - २४०१ A ०२९)
(राज्य हिस्सा - २४०१ A ०११)

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०२१/प्र.क्र.७/कार्यासन ६**
**मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२**
दिनांक : - **२८** मार्च, **२०२२.**

**वाचा :-**

१) वित्त विभाग, शासन निर्णय क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि.२४.०६.२०२१, दि.१४.१०.२०२१, दि.०३.०२.२०२२ व दि.१७.०३.२०२२.
२) आदिवासी विकास विभाग, शा. नि.क्र. बीयुडी-२०२१/प्र.क्र. ७/कार्यासन-६, दि.१.१२.२०२१.
३) केंद्र शासन, कृषी मंत्रालय यांचे पत्र क्र. F.No.१८-२४/२०१७१-२१/२०१८-RFS-III (pt), Dt.२४.०२.२०२२.
४) कृषि व पदुम विभागाची नस्ती क्र.राफअ-२०२२/प्र.क्र. ३७/कार्या-९ अे.

**प्रस्तावना :-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत केंद्र पुरस्कृत एकात्मिक फलोत्पादन विकास अभियान या योजनेसाठी सन २०२०-२१ च्या अर्थसंकल्पित तरतुदींतून केंद्र हिस्सा रु.१६७.६७ लाख व समरुप राज्य हिस्सा रु.१११.७८ लाख असा एकूण रु.२७९.४५ लाख इतका निधी वितरीत करण्याबाबत संदर्भाधीन क्र.४ अन्वये कृषि व पदुम विभागामार्फत प्रस्ताव वित्त विभागास सादर करण्यात आला होता. सदर प्रस्तावास वित्त विभागाने दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत मागणी क्र.टी-५ याखाली मुख्य लेखाशीर्ष २४०१, पीक संवर्धन, एकात्मिक फलोत्पादन विकासासाठी केंद्र पुरस्कृत एकात्मिक फलोत्पादन विकास अभियान या योजनेसाठी वित्त विभागाने दिलेल्या मान्यतेस अनुसरुन सन २०२१-२२ च्या अर्थसंकल्पित तरतुदींतून केंद्र हिस्सा रु.१६७.०० लाख व समरुप राज्य हिस्सा रु.१११.७८ लाख असा एकूण **रु.२७८.७८** लाख इतका निधी वितरीत व खर्च करण्यास खालीलप्रमाणे मान्यता देण्यात येत आहे :-

**(रु.लाखात)**

| योजनेचे नाव | लेखाशिर्ष व केंद्र राज्य / हिस्सा | बाब | सन २१-२०२० मधील अर्थसंकल्पीय तरतूद | कृषी विभागाने प्रस्तावित केलेले वितरण | या शा अन्वये .नि. वितरीत करण्यात येत असलेला निधी |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ६ | ७ |
| एकात्मिक फलोत्पादन विकासासाठी केंद्र पुरस्कृत अभियान | २४०१ A ०२९ केंद्र हिस्सा (६० %) | ३३, अर्थसहाय्य | १४००.०० | १६७.०० | १६७.०० |
| | २४०१A ०११ राज्य हिस्सा (४० %) | | १०००.०० | १११.७८ | १११.७८ |
| **एकूण** | | | **२४००.००** | **२७८.७८** | **२७८.७८** |

२. उपरोक्त प्रमाणे **रु.२७८.७८ लाख (अक्षरी रुपये दोन कोटी अठ्ठयाहत्तर लाख अठ्ठयाहत्तर हजार फक्त)** इतका निधी प्रशासकीय विभागप्रमुख म्हणून सचिव, कृषी विभाग यांना अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात येत आहे.

३. सदर तरतुद खर्च करताना महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तीय नियम तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्र.१ च्या शासन आदेशातील दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करण्याची जबाबदारी संबंधित प्रशासकीय विभागाची राहील.

४. सदर उपलब्ध करुन दिलेल्या तरतुदींतून झालेल्या झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय / उपलेखाशिर्षनिहाय साध्य झालेले भौतिक उद्दिष्टनिहाय माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र इ. माहिती आदिवासी विकास विभागास प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवावी व निधी उपयोगिता प्रमाणपत्रासह पुढील निधी वितरणासाठी प्रस्ताव सादर करावा.

५. नियंत्रण अधिकारी व विभाग प्रमुख यांनी आदिवासी उपयोजना क्षेत्रात, आदिवासी उपयोजना बाह्य क्षेत्रात केलेला खर्च स्वतंत्रपणे नोंदविला जाईल याची दक्षता घ्यावी. जेणेकरुन शासनाला आदिवासी क्षेत्रातील व उपयोजना क्षेत्राबाहेरील योजनांवर होणा-या खर्चावर संनियंत्रण ठेवता येईल.

६. आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत उपलब्ध करुन दिलेल्या तरतुदीतून आदिवासी उपयोजना क्षेत्रात पायाभूत सुविधा निर्माण करण्याबाबतच्या तसेच वैयक्तिक लाभाच्या योजना घेण्यात याव्यात तथापि, आदिवासी उपयोजना बाहय क्षेत्रात मात्र वैयक्तिक लाभाच्याच योजना घेण्यात याव्यात.

७. सदर शासन निर्णय वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.२५८/व्यय-१४, दि.२१.०३.२०२२ अन्वये दिलेल्या सहमतीस अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०३२४१२३६३३३७२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

RAVINDRA D AUTE

Digitally signed by RAVINDRA D AUTE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f05a6913f9dee1f453c9a1c5a89d8c4897737ba8e4ac0edf3f2c6e69e25f4108, pseudonym=C4ECFFC229308BD3BD1E334FAC78848FBF7F7613, serialNumber=CA98EFAC317508AB9B5820B47955BC1BABB173F20D25ABD816ED91A9B6B0F16C, cn=RAVINDRA D AUTE
Date: 2022.03.29 15:55:09 +05'30'

**(रविंद्र दि. औटे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा. राज्यमंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. सचिव (कृषि) कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. आयुक्त (कृषि), महाराष्ट्र राज्य,पुणे.
५. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
६. अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक / नागपूर / ठाणे / अमरावती.
७. वित्त विभाग ( अर्थसंकल्प- १९/ व्यय १४ ), मंत्रालय, मुंबई.
८. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५ वा मजला, विधानभवन, मुंबई.
९. महालेखापाल (लेखापरिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
१०. निवड नस्ती (का.६), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.